UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या प्रकल्पाअंतर्गत निधी वितरीत करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एस-१०/२०२३/प्र.क्र.१७५/फ-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १९ मार्च, २०२४.

वाचा :-

१. महसूल व वन विभाग शासन निर्णय क्र. एस-१०/२०१७/प्र.क्र.६७/फ-३, दि. १.०७.२०२१.
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२.०४.२०२३.
३. अपर प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१२/६९/२०२३-२४, दिनांक १.०६.२०२३.
४. शासन निर्णय समक्रमांक दिनांक ६.०७.२०२३, दिनांक ९.११.२०२३ व दिनांक २०.०२.२०२४.
५. अपर प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१२/२०१/२०२३-२४, दिनांक ३.११.२०२३.
६. अपर प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१२/३२८/२०२३-२४, दिनांक १३.०२.२०२४.
७. अपर प्रधान मुख्य वनसरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/सी/यो/प्र.क्र.१२/२११/२०२३-२४, दिनांक १९.०१.२०२४.
८. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. ४.०३.२०२४.

प्रस्तावना :-

UNDP-Green Climate Fund यांच्या आंशिक अर्थ सहाय्यातून "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" या प्रकल्पास सह-आर्थिक बांधिलकीने राज्यात राबविण्याच्या प्रस्तावास दिनांक **१०.०६.२०२१** रोजी मा.मंत्रीमंडळाने दिलेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय दिनांक **१.०७.२०२१** अन्वये प्रकल्पाची रुपरेषा स्पष्ट करण्यात आली आहे.

२. UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या लेखाशिर्षात सन २०२३-२४ करिता सुधारित अंदाजानुसार एकूण रु. १०००.०० लक्ष निधी मंजूर आहे.

३. प्रस्तुत योजनेअंतर्गत सन २०२३-२४ या चालू वर्षात कांदळवनांचे पुन:स्थापन रोपवन, कांदळवन रोपवन व नर्सरी व इतर कामाकरिता आवश्यक एकूण रु. ७०३.६७ लक्ष (०२- मजूरी- रु. २६८.८५४ लक्ष, २१- साहित्य व पुरवठा- रु. १०.६९२ लक्ष व ५०-इतर खर्च रु. ४२४.१३१ लक्ष) निधी वितरीत करण्याचे प्रस्ताव अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र. ३, ५ ते ७ च्या पत्रान्वये शासनास सादर केला आहे. मागणी केलेल्या उक्त रु. ६८५.७४७ लक्ष निधीपैकी एकूण

रु. ४७३.०९४ लक्ष (०२- मजूरी- रु. २६८.८५४ लक्ष, २१- साहित्य व पुरवठा- रु. ४.९९२ लक्ष व ५०-इतर खर्च रु. १९९.२४८ लक्ष) निधी या विभागाच्या संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

४. वित्त विभाग, शासन परिपत्रक दिनांक ४.०३.२०२४ अन्वये प्रस्तुत लेखाशिर्षाअंतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत ०२- मजूरी या उद्दिष्टांसाठी अर्थसंकल्पित निधीची १०० टक्के तरतूद उपलब्ध असून इतर २१- साहित्य व पुरवठा व ५०- इतर खर्च उपशिर्षांतर्गत सुधारित अंदाजाच्या मर्यादेत मागणीतील शिल्लक निधी वितरीत करण्यास नियोजन व वित्त विभागाने मान्यता दर्शविली आहे.

४. आता, या योजनेअंतर्गत सुधारीत अंदाजानुसार (Revise Estimate) सद्य:स्थितीत उपलब्ध रु. २३०.५८३ लक्ष (२१- साहित्य व पुरवठा- ५.७ लक्ष व ५०-इतर खर्च २२४.८८३ लक्ष) निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

सन २०२३-२४ करिता UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) अंतर्गत मागणी केलेल्या निधीपैकी उपलेखाशिर्षांतर्गत सुधारित अंदाजपत्रकानुसार उपलब्ध निधीच्या मर्यादेत एकूण रु. २३०.५८ लक्ष निधी पुढील तपशिलानुसार तसेच अटींच्या अधीन राहून खर्च करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र | कामाचा तपशिल | २१- साहित्य व पुरवठा | ५०- इतर खर्च | वितरित रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | पालघर व अलिबाग जिल्हयात कांदळवनांचे पुन:स्थापन रोपवन व नर्सरी च्या कामाकरिता | ५,६९,९६९ | ० | ५,६९,९६९ |
| २ | जल व मृद संधारणाची कामे (Gabian Structure) | ० | २,०६,९५,२४५ | २,०६,९५,२४५ |
| ३ | शोभिवंत मासे पालन, कालवे पालन, खेकडा पालन व शिणाने पालन | ० | १७,९२,७५५ | १७,९२,७५५ |
| | एकूण | ५,६९,९६९ | २,२४,८८,००० | २,३०,५७,९६९ |

१) ज्या प्रयोजनासाठी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच प्रयोजनावर निधी खर्च करण्यात यावा.
२) यामध्ये कोणत्याही प्रकारची वित्तिय अनियमितता होणार नाही, याची पुरेपूर दक्षता घेण्यात यावी.
३) वित्त विभागाने दिनांक ११/७/२००१ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या वित्तिय मर्यादा यापुढेही लागू राहतील.
४) सदर मान्यता ही सन २०२३-२४ या कालावधी करिताच देण्यात येत आहे.
५) सदर कामे करताना वन (संवर्धन एवं संरक्षण) अधिनियम, १९८० चा भंग होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.
६) निधी वितरीत करताना प्रस्तुत कामे दुबार होत नसल्याची खातरजमा करावी.
७) खर्चाच्या अनुषंगाने उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

२. सदर खर्च हा मागणी क्रमांक- सी-७, २४०६ वनीकरण व वन्यजीवन यावरील भांडवली खर्च UNDP-GCF Project "Enhancing Climate Resilience of India's Coastal Communities" (२४०६ B२७२) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावा व सन २०२३-२४ मध्ये मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. निधी

खर्च करताना वित्त विभागाने मासिक निधी विवरणपत्र तसेच वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या परिपत्रकातील अटी व सूचनांचे पालन करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१०२/व्यय-१०, दिनांक ११.०३.२०२४ च्या मान्यतेने व शासन निर्णय क्रमांक वि.अ.प्र.-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम /भाग-२, दिनांक १७/४/२०१५ भाग पहिला उप विभाग-३ परिच्छेद २७ (२) अन्वये व वित्त विभागाच्या परिपत्रक दिनांक ४.०३.२०२४ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१९१६५२२९९७१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

APARNA SUHAS UPASANI

Digitally signed by APARNA SUHAS UPASANI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=130a2ee40839d75ff18e93244499097828091ef8e09f856d6e8f0c403254f40a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=00DDF81FCF3DFD3E814E1C6D5D5D1249D28D65601EB04ECDFF837C158CB2ED4C, cn=APARNA SUHAS UPASANI
Date: 2024.03.19 17:02:37 +05'30'

( अपर्णा उपासनी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत :-

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (संधारण) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कांदळवन कक्ष), मुंबई.
६) मुख्य वनसंरक्षक (भूमी अभिलेख कक्ष), नागपूर.
७) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९) वित्त विभाग, व्यय १०/ अर्थसं-४ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०) कार्यासन अधिकारी (फ-२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) कार्यासन अधिकारी, ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) निवडनस्ती, कार्यासन (फ-३), म.व.व.वि., मंत्रालय, मुंबई-३२.